**महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे पुणे येथे खंडपीठ स्थापन करणे व या कार्यालयाकरीता पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक - एमआरटी ५३०८/प्र.क्र.१२४/टी-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- २१ जुलै, २००९.**

**पार्श्वभूमी :-**

महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे पुणे येथे खंडपीठ स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ मध्ये जरूर त्या सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता (सुधारणा) अधिनियम २००९ (महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २००९ चा १०) हा दिनांक २४.०३.२००९ रोजी प्रसिध्द करण्यात आला आहे. या अधिनियमातील कलम ३१४ अनुसार महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे पुणे येथे खंडपीठ स्थापन करणे आवश्यक आहे. तसेच, उक्त अधिनियमातील तरतुदीनुसार पुणे खंडपीठावर सदस्य, उपप्रबंधक व इतर कर्मचारीवृंद याकरीता आवश्यक असणारी पदे निर्माण करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे पुणे येथे खंडपीठ स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला असून सदर खंडपीठासाठी पुढीलप्रमाणे पदे निर्माण करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

**महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे पुणे येथील खंडपीठ**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (पाचव्या वेतन आयोगानुसार) | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | सदस्य | १५,०००/-(प्रतिमाह मानधन) | २ |
| २ | उप प्रबंधक | ७४५०-२२५- ११५०० | १ |
| ३ | अव्वल कारकून | ४५००-१२५-७००० | ३ |
| ४ | लिपिक- टंकलेखक | ३०५०-७५-३९५०- ८०-४५९० | ३ |
| ५ | लघु लेखक (नि.श्रे.) | ५५००-१७५-९००० | २ |
| ६ | दफ्तरी | २६१०-६०-२९१०- ६५-३३००-७०-४००० | १ |
| ७ | शिपाई | २५५०-५५-२६६०- ६०-३२०० | ३ |
| | | **एकूण** | **१५** |

२. या कार्यालयाची नव्यानेच स्थापना होत असल्याने उपरोक्त १५ पदांच्या वेतन व भत्त्यांकरिता तसेच कार्यालयीन खर्चासाठी आवश्यक असणाऱ्या खर्चाकरीता सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात रु.२८,७९,०००/- इतक्या रकमेचा नवीन बाब प्रस्ताव विधानमंडळाच्या सन २००९ च्या दुसऱ्या अधिवेशनात मंजूर करण्यात आला आहे.

३.		वर परिच्छेद १ मध्ये नमूद केलेली पदे प्रथमत: महाराष्ट्र जमीन महसूल संहिता (सुधारणा) अधिनियम २००९ (महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २००९ चा १०) हा अंमलात आल्याच्या दिनांकापासून दिनांक २८ फेब्रुवारी,२०१० पर्यंत चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४.		याकरिता होणारा खर्च, **मागणी क्रमांक सी-४, २०५२-सचिवालयीन सर्वसाधारण सेवा (००) (०९९) महसूल मंडळ, (००)(०१) महसूल मंडळ, (२०५२ ०२२१)** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००९-२०१० या आर्थिक वर्षासाठी नवीन बाबीद्वारे मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५.		हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. : १६४/०९/व्यय-९ दिनांक १८.०५.२००९ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **200907211630250001** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( जे. पी. डांगे )**
**अपर मुख्य सचिव (महसूल), महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

प्रबंधक, महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरण, जुने सचिवालय विस्तार इमारत, दुसरा मजला,
महात्मा गांधी मार्ग, मुंबई-४०० ०३२.

**प्रत अग्रेषित :-**

महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल, (लेखापरिक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल, (लेखापरिक्षा) - १, महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई **(पत्राने)**
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, (विधी विधान), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
वित्त विभाग/ व्यय-९, अर्थसंकल्प-६ व वित्तीय सुधारणा कार्यासन मंत्रालय, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
महसूल व वन विभाग/ ब-१, ई-१ व ल-९ कार्यासने, मंत्रालय, मुंबई
उप प्रबंधक, महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरण, औरंगाबाद व नागपूर खंडपीठ,
निवडनस्ती, टी- १ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.